शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये शिल्प कारागीर प्रशिक्षण योजनेअंतर्गत अभ्यासक्रमांसाठी प्रवेश घेतलेल्या सर्व प्रवर्गातील प्रशिक्षणार्थ्यांना सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षापासून दर महा रूपये ५००/- इतक्या सुधारीत दराने विद्यावेतन देण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन पुरकपत्र क्रमांक : आयटीआय- २०१२/प्र.क्र.७९/व्यशि-३**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक : १५ मार्च, २०२४.**

वाचा :- कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. आयटीआय- २०१२/प्र.क्र.७९/व्यशि-३ दिनांक १३ सप्टेंबर, २०२३

**शासन पुरकपत्र :-**

दिनांक १३.०९.२०२३ च्या शासन निर्णयाअन्वये शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षणार्थी यांचे विद्यावेतन सुधारित दराने रु. ५००/- करण्याबाबत शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयामधील पहिल्या परिच्छेदामधील मुद्दा क्र. ६ मध्ये अतिरिक्त माहिती पुढीलप्रमाणे समावेश करण्यात येत आहे. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षण सुरु होण्याचा दिनांक / प्रशिक्षणार्थ्यांचा प्रवेशाचा दिनांक ०१ ते १५ मधील असल्यास सदर प्रशिक्षणार्थ्यांना पूर्ण महिन्याचे विद्यावेतन देय राहील. संस्थेतील प्रशिक्षण सुरु होण्याचा दिनांक/प्रशिक्षणार्थ्यांचा प्रवेशाचा दिनांक १६ ते ३०/३१ असल्यास त्या महिन्याचे विद्यावेतन देय राहणार नाही. अशा वेळी विद्यावेतन पुढील महिन्यापासून देय राहील.

तसेच सदर शासन निर्णयामध्ये आदिवासी विद्यार्थ्यांना विद्यावेतन अदा करण्याकरीता "औद्योगिक प्रशिक्षण संस्था-कारागीर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण विस्तार (राज्यस्तर योजना) (कार्यक्रम) २२३०६०७४" लेखाशिर्षाचा समावेश करण्यात येत आहे.

सदर शासन पुरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०२४०३१५२३२५५७१४०३ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMDEO KONDIBA BHOSALE

Digitally signed by NAMDEO KONDIBA BHOSALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, 2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C6A286229ECC7982A08553F49D547EF64BE25C7F26FC96324ECE7CCCBFEB8C5, cn=NAMDEO KONDIBA BHOSALE
Date: 2024.03.15 23:35:48 +05'30'

**(डॉ. ना. को. भोसले)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, कौशल्य, रोजगार,उदयोजकता व नाविन्यता विभाग यांचे स्वीय सहायक,

मंत्रालय, मुंबई

२. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय (संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय) मुंबई

३. सह सचिव, कौशल्य, रोजगार,उदयोजकता व नाविन्यता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

४. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५. जिल्हा कोषागार कार्यालय (सर्व जिल्हा)

६. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर,

७. सह/ उप संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय, मुंबई

८. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय संचालनालयामार्फत

९. प्राचार्य, शासकीय औदयोगिक प्रशिक्षण संस्था (सर्व)

१०. निवडनस्ती.